**होमगार्ड स्वयंसेवकांच्या मानधनावर होणारा खर्च नियंत्रित करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एचजीएस २०१९/प्र.क्र.७७/विशा-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०५ फेब्रुवारी, २०२०

**<u>शासन निर्णय</u>:-**

सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी "मुख्य लेखाशिर्ष २०७०- इतर प्रशासनिक सेवा, (००)(१०७) होमगार्ड (००)(०१) होमगार्ड (२०७० ०२८१) - २८ --"व्यवसायिक सेवा" या लेखाशिर्षांखाली अर्थसंकल्पीय तरतूद रु १०६.६१ कोटी आणि पुरवणी मागणीद्वारे रु ३० कोटी अशी मिळून रु १३६.६१ कोटी एवढी तरतूद आहे. त्यापैकी रु १०३.२८ कोटी एवढे अनुदान वितरीत करण्यात आले आहे. सद्यस्थितीत राज्यातील सर्व होमगार्ड यांच्या माहे सप्टेंबर-२०१९ ते आजपर्यत झालेल्या बंदोबस्ताबाबतची भत्तांची रु १३७,८२,९६,०७५ इतक्या रक्कमेची देयके जिल्हा कार्यालयाच्या स्तरावर अनुदाना अभावी प्रलंबित आहेत. तसेच मार्च २०२० बंदोबस्तासाठी रु १४०.५५ कोटी एवढा अतिरिक्त खर्च होणार आहे. त्यामुळे चालू वित्तीय वर्षात एकूण खर्च रुपये ३८० कोटीपेक्षा जास्त होणार आहे. मागील काही वर्षातील झालेला प्रत्यक्ष खर्च विचारात घेता यावर्षी सदर खर्चात मानधन वाढ, होमगार्डची नवीन नोंदणी, पोलीस घटकांसाठी कायमस्वरुपी होमगार्ड उपलबध करुन देणे इत्यादी कारणांमुळे मोठया प्रमाणात वाढ झालेली आहे. त्यामुळे होमगार्ड मानधनासाठी चालू आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत झालेली संपूर्ण रक्कम वितरीत करण्यास मान्यता देण्यासाठी प्रस्ताव वित्त विभागास सादर केला होता. त्यावर वित्त विभागाने खर्च मर्यादित ठेवण्यासाठी प्रतिवर्षी होमगार्डचे २६,४०,००० मनुष्य दिवस / कर्तव्य दिवस तसेच प्रतिवर्षी होणारा खर्च रु १७५ कोटी एवढा मर्यादित ठेवण्याच्या अटीवर रु ३३.३२ कोटी एवढा निधी वितरित करण्यास मान्यता दिली आहे.

२. उपरोक्त पाश्वभूमीवर होमगार्ड मानधनावर होणारा खर्च मर्यादित ठेवण्यासाठी शासन खालीलप्रमाणे निर्देश देत आहे :-

(१) होमगार्ड मानधनावर होणारा खर्च मर्यादित ठेवण्यासाठी प्रतिवर्षी होमगार्डचे कार्याचे दिवस प्रतिवर्षी २६,४०,००० मनुष्य दिवस / कर्तव्य दिवस पर्यंत मर्यादित ठेवावेत.

(२) होमगार्ड मानधनावर होणारा खर्च मर्यादित ठेवण्यासाठी होमगार्डचे प्रतिवर्षी होणारा खर्च रु १७५ कोटी एवढा मर्यादित ठेवावा.

(३) महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य यांनी सदर निर्देश सर्व जिल्हा समादेशकांच्या निदर्शनास आणून त्यानुसार होमगार्ड स्वयंसेवकांना देण्यात येणाऱ्या कर्तव्य दिवसांचे नियोजन करावे.

३. सदर शासन निर्देश वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५/२०२०/व्यय-८, दि. १३.०१.२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

४.   सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००२०५१५२४१५५९२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Deepak Vasant Sawant

Digitally signed by Deepak Vasant Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=43cdfecb6fd26ff7b1b970520962ebf72d86546b921512 14820b2bb31f3ccac8, serialNumber=66ea8e25496abe127ddbfd3157e10ae5a1fb12e73 8b63f8a5b2cb92885fd1f05, cn=Deepak Vasant Sawant
Date: 2020.02.05 15:30:11 +05'30'

(दि. व. सावंत)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
४. सर्व जिल्हा समादेशक, होमगार्ड
५. महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाच्या अधिपत्त्याखालील सर्व कार्यालये.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१०. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-८ / अर्थसं-११), मंत्रालय, मुंबई ४००० ३२.
११. निवड नस्ती, विशा-८, गृह विभाग, मंत्रालय,मुंबई.